एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत अंगणवाडी केंद्रांना आदर्श अंगणवाडी केंद्रात रुपांतर करणेसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२३/प्र.क्र.२००/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-१० जुलै, २०२३

**संदर्भ:-**१) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१६ /प्र.क्र.९७ (भाग-२)/का.०६, दिनांक २०.०६.२०२२
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं- २०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत एकात्मिक बाल विकास सेवा योजना कार्यक्रमाखाली आदर्श अंगणवाडी केंद्रांना आदर्श अंगणवाडी केंद्रांमध्ये रुपांतर करण्यासाठी "स्मार्ट अंगणवाडी किट" उपलब्ध करून देण्यात येते. त्यानुसार प्रस्तुत प्रयोजनाकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात संदर्भाधीन दिनांक २०.०६.२०२२ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने पुरवठा झालेल्या स्मार्ट अंगणवाडी किटची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत एकात्मिक बाल विकास सेवा योजना कार्यक्रमाखाली "आदर्श अंगणवाडी योजना" या राज्य योजनेअंतर्गत संदर्भाधीन दिनांक २०.०६.२०२२ रोजीच्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात पुरवठा झालेल्या "स्मार्ट अंगणवाडी किट"ची प्रलंबित देयके सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अदा करण्यासाठी खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक १ मधील लेखाशीर्ष / उद्दिष्टांकरिता रकाना क्रमांक ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये २४३.८१०८७ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी त्रेचाळीस लाख एक्याऐंशी हजार सत्याऐंशी फ़क्त) इतका निधी या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यास व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत निधी २०२३-२४ | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| २२३६- पोषण आहार<br>०२- पोषक अन्न व पेये यांचे वितरण<br>१०१- विशेष पोषण आहार कार्यक्रम<br>(१३) आदर्श अंगणवाडी प्रकल्प,<br>(१३)(०१) आदर्श अंगणवाडी योजना (कार्यक्रम)<br>(२२३६ २१२८)<br>३१- सहायक अनुदाने(वेतनेतर) | ९०००.०० | २४३.८१०८७ |

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी वित्त विभागाच्या दिनांक ०४.०४.२०२२ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

३. सदर शासन निर्णय संदर्भाधीन क्रमांक २ येथील वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७१०११५५५८१३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL DEORAO SARDAR

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=778B75C2C14BADBE6832D77601CF425AA7979B907650965C83919DBA7DC458C7, cn=SUNIL DEORAO SARDAR
Date: 2023.08.21 17:15:11 +05'30'

**( सुनिल सरदार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,
३) मा. मंत्री (म. व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
५) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास,
६) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद,
७) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,
११) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६), मंत्रालय, मुंबई,
१२) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) निवड नस्ती -का-६.